**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत खामगाव ( जिल्हा- बुलडाणा ) येथील मुला-मुलींच्या प्रत्येकी ०१ वसतीगृहाच्या बांधकामांसाठी राज्य हिश्श्यांतर्गत मंजूर निधी उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०१४/प्र.क्र.१४१/का-७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: १६/०९/२०२०

संदर्भ: -

१. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांची पत्रे क्र.०३/१३(४)/२०१३-PP,व दि.२३/१२/२०१५.
२. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(४)/२०१३-PP, दि.२७/०२/२०१६.
३. शासन निर्णय:- अविवि-२०१४/प्रक्र.१४१/का.०७ दि.३१/०३/२०१६.
४. शासन निर्णय:-अविवि-२०१४/प्रक्र.१४१/का.०७ दि.३०/०४/२०१६.
५. शासन निर्णय क्रमांक:- अविवि-२०१४/प्रक्र.१४१/का.०७ दि.२३/०५/२०१६.
६. अवर सचिव,अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.१३/२९/२०१९ -MsDP- MoMA,दि.१९/०९/२०१९.
७. शासन निर्णय:-अविवि-२०१४/प्रक्र.१४१/का.०७ दि.१५/११/२०१९.
८. जिल्हधिकारी कार्यालय,बुलडाणा यांचे पत्र क्र.कावि/अका/अल्पसंख्याक कक्ष/४६/२०२० दि.११/०३/२०२० रोजीचे पत्र.

प्रस्तावना -

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (पुर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP) गठित शक्तीप्रदान समितीने दि.१४/१२/२०१५ रोजीच्या १०६ व्या व दिनांक २६/०२/२०१६ रोजीच्या ११६ व्या बैठकीत खामगाव, जि.बुलडाणा येथे मुलां-मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे रू.३१०.०० लाख किंमतीचे प्रत्येकी १ वसतीगृह याप्रमाणे एकूण २ वसतीगृहाच्या बांधकामाच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. यासंदर्भात केंद्रशासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक (५) येथील शासन निर्णयाव्दारे खामगाव जि.बुलडाणा येथे मुलां-मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी १ याप्रमाणे एकूण २ वसतीगृह बांधकामास रू.८२६.०८ लाख इतक्या रकमेची प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदरहू प्रकरणी संदर्भ क्र.(३),(४) आणि (७) अन्वये केंद्र व राज्य हिश्श्यातील पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील रु.६२०.०० लाख इतका निधी जिल्हाधिकारी बुलडाणा यांना मंजूर करुन वितरित करण्यात आला आहे.

२. जिल्हाधिकारी,बुलडाणा यांनी उर्वरित राज्य हिश्श्यातील रू.२०६.०८ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत केलेल्या विनंतीस अनुसरून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील मंजूर निधीतून बुलडाणा जिल्ह्यातील खामगाव येथील मुलां-मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी १ याप्रमाणे एकूण २ वसतीगृह इमारत बांधकामासाठी निधी वितरण करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. सद्यस्थितीत उक्त

योजनेंतर्गत निधीची उपलब्धतता विचारात घेऊन रू.१०३.०४ लाख इतका निधी जिल्हाधिकारी बुलडाणा यांना मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रमातंर्गत-PMJVK (पुर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP) जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी मागणी केल्यानुसार खामगाव जि.बुलडाणा येथे मुलां-मुलींसाठी १०० प्रवेशक्षमतेचे प्रत्येकी १ याप्रमाणे एकूण २ वसतीगृह बांधकामास राज्य हिश्श्यातील रू.२०६.०८ लाख इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. प्रस्तुत प्रकरणी सद्यस्थितीत उक्त योजनेंतर्गत निधीची उपलब्धतता विचारात घेऊन बुलडाणा जिल्ह्यास जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी मागणी केलेल्या रू.२०६.०८ लाख इतक्या रकमेच्या ५० टक्के म्हणजेच रू.१०३.०४ लाख इतका निधी खालील तक्त्यातील स्तंभ क्र. (८) प्रमाणे निधी मंजूर करुन वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

(रूपये लाखात)

| गट | कामांचे नाव | हिश्श्याचे प्रमाण | प्रशाकीय मान्यता | केंद्र शासनाची प्रती युनिट किंमत | वितरीत पहिला व दुसरा हप्ता | | सन २०२०-२१ मध्ये वितरीत करावयाचा निधी (५० % या प्रमाणात) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | केंद्र | राज्य | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| **खामगाव** | मुलांचे वसतीगृह | ६०:४० | ४१३.०४ | ३१०.०० | १८६.०० | १२४.०० | ५१.५२ |
| | मुलींचे वसतीगृह | १००:०० | ४१३.०४ | ३१०.०० | ३१०.०० | - | ५१.५२ |
| **एकूण** | | | **८२६.०८** | **६२०.००** | **४९६.००** | **१२४.००** | **१०३.०४** |

२. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(८) प्रमाणे सन २०२०-२१ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (पुर्वीचा बहुक्षेत्र विकास कार्यक्रम) बुलडाणा जिल्ह्यातील खामगाव गटातील वसतीगृह बांधकामासाठी राज्य हिश्यातील रु.१०३.०४ लाख एवढी रक्कम जिल्हाधिकारी,बुलडाणा यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सन २०२०-२१ या वर्षात जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(८) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी वर्षात प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम-PMJVK (पुर्वीचा बहु क्षेत्र विकास कार्यक्रम-MsDP) अंतर्गत विषयांकित ०२ वसतीगृह बांधकामासाठी या योजनेकरीता आहरित केलेली रक्कम संबंधित अमंलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

४.	सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

५.	अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत ०१ मुलांचे वसतीगृह व ०१ मुलींचे वसतीगृह बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रांसह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत वसतीगृह बांधकामाची माहिती वेळोवेळी Upload करावी.

६.	प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम अंतर्गत प्रस्तावित कामाच्या ठिकाणी ठळकपणे निदर्शनास येईल अशा ठिकाणी फलक लावण्यात यावा व त्यावर खालील बाबीचा समावेश करण्यात यावा.

- भारत सरकारचे राजचिन्ह /भारत सरकारच्या मंत्रालय /विभगाचे नाव
- प्रकल्प किंमत / केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण.
- योजनेचे नाव.
- काम सूरू होण्याचा दिनांक.
- अंमलबजावणी यंत्रणा.
- अधिकच्या माहिती व अभिप्रायासाठी अधिकारी/अंमलबजावणी यंत्रणा यांचे संपर्काचा तपशिल संकेतस्थळासह.

७.	सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रझेड. ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, (केंद्र हिस्सा (२२३५- ए ५४३) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदान "(वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली व राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रझेड. ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१) (१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, ( राज्य हिस्सा (२२३५-ए २३१) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदान "(वेतनेतर) मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८.	हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.१६/०४/२०२० अन्वये अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.९५/२०२०/व्यय-१ दि.२४/०६/२०२० रोजीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१६१४२६४०७५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.09.16 14:41:59 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति:-**

१. जिल्हाधिकारी,बुलडाणा.

**प्रत:-**

१. प्रधान सचिव/सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग/कौशल्य विकास व उद्योजकता विभाग/ सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे),मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त,अमरावती.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
४. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
५. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,बुलडाणा.
६. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७. संचालक,तंत्र शिक्षण संचालानाय,मुंबई.
८. प्रचार्य,शासकिय तंत्र निकेतन महाविद्यालय,खामगाव,जि.बुलडाणा.
९. जिल्हा कोषागार अधिकारी,बुलडाणा.
१०. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४/ व्यय -४),मंत्रालय, मुंबई.
११. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१२. निवड नस्ती,का.७.